

**महाराष्ट्र शासन**

**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन ज्ञापन क्र.सानुग्र-३९२१/प्र.क्र.१४४/ना.पु.१५**

मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २५ जानेवारी, २०२२.

**<u>विषय</u> :-** कै.बापुय्या डी. स्वामी, अव्वल कारकून, अन्नधान्य वितरण कार्यालय,सोलापूर यांचा कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार कोवीड-१९ संबंधित कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत असताना कोव्हीड-१९ संसर्गाने मृत्यु झाल्यामुळे त्यांच्या कुटूंबियांना रु.५० लक्ष सानुग्रह सहाय्य मंजूरीबाबत.

**<u>संदर्भ</u> :-**१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० व दि.१४.०५.२०२१.
२) जिल्हा पुरवठा कार्यालय, नागपूर यांचे पत्र क्र.९/जिपुअ/क.लि.आस्था/ कावि-२७२/२०२१, दि.२४/०६/२०२१.

**<u>ज्ञापन :-</u>**

अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, सोलापूर येथे कार्यरत असलेले कै. बापुय्या डी. स्वामी, अव्वल कारकून यांची कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर शासन आदेशानुसार लॉकडाऊनच्या काळात शिधापत्रिकाधारक लाभार्थी धान्यापासून वंचित राहू नये, रास्तभाव दुकानदार दुकाने उघडतात किंवा नाही हे पाहण्याच्या दृष्टीने नेमलेल्या भरारी पथकात नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री.स्वामी हे राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियमांतर्गत अत्यावश्यक /जीवनावश्यक वस्तू वितरणाशी संबंधित कर्तव्य व जबाबदारी पार पाडताना त्यांचा कोरोना विषाणू संसर्गाने दिनांक ०९/०४/२०२१ रोजी मृत्यू झाला आहे.

२. अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय,सोलापूर यांनी उक्त मृत अव्वल कारकून, कै.बापुय्या स्वामी यांच्या कुटूंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० अनुसार रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. मा.जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या शासन आदेशानुसार कै. बापुय्या स्वामी कोव्हीड-१९ विषाणूच्या पार्श्वभूमीवर नेमलेल्या भरारी पथकात कामकाज करण्याचे कर्तव्य बजावत होते, असे नमूद केले आहे.

४. अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय,सोलापूर यांनी कै. बापुय्या स्वामी यांना गंगामाई हॉस्पिटल, सोलापूर येथे दाखल करण्यापूर्वी १४ दिवसांच्या काळात ते कार्यालयात कर्तव्यावर हजर होते असे नमूद केले आहे.

५. गंगामाई हॉस्पिटल, सोलापूर यांनी कै. बापुय्या स्वामी यांचा मृत्यू हा “कोव्हीड -१९” या रोगाच्या संसर्गामुळे झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

६. **उप निबंधक (जन्म व मृत्यू) नोंदणी कार्यालय,** सोलापूर **महानगरपालिका** यांनी कै.स्वामी यांचा मृत्यू हा दिनांक **०९/०४/२०२१** रोजी झालेला असल्याचे **मृत्यू प्रमाणपत्र** दिले आहे.

७. कै. बापुय्या स्वामी यांच्या **पत्नी** श्रीम. श्रीदेवी बापुय्या स्वामी यांनी रु.५०.०० लक्ष सानुग्रह अनुदान मिळण्याबाबतचा दिनांक १०/११/२०२१ रोजीचा **विनंती अर्ज** अन्नधान्य पुरवठा कार्यालय, सोलापूर यांना सादर केलेला आहे.

८. त्यानुसार अन्नधान्य पुरवठा अधिकारी कार्यालय, सोलापूर येथे कार्यरत असलेले अव्वल कारकून, कै. बापुय्या स्वामी यांच्या कुटुंबियांना रक्कम रु.५०.०० लक्ष/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) सानुग्रह सहाय्य म्हणून प्रदान करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

९. उक्त खर्च "मागणी क्र.एम-२, मुख्य लेखाशीर्ष २४०८- अन्न,साठवण व वखार साठवण (०१), अन्न (१०१) प्रापण व पुरवठा (०३) प्रापण, वितरण व किंमत नियंत्रण अंतर्गत "(०३) (०२) मुफसल (अनिवार्य) दत्तमत (२४०८०१०८) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. सदर ज्ञापन वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९/०५/२०२० व दिनांक १४/०५/२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदरचे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०१२५१६५९४५५१०६ असा आहे. सदर ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09c74e56a555b1257e71176f4c700164528f1b5b3ff73c027668f5ff29c069da, pseudonym=F96B319C5E7CA67F25C683A1131E7C5451ABA934, serialNumber=DEE8A196FB0BB879933A88F87075CC443D363994879D49E0C1BA541465369700, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2022.01.25 17:04:10 +05'30'

**(गजानन रा.देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, सोलापूर.

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव -**

१) आहरण व संवितरण अधिकारी, अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय, सोलापूर
२) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.

**प्रत माहितीस्तव-**

१) मा.जिल्हाधिकारी, सोलापूर.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३) वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय,अ.ना.पु.व.ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
४) श्रीम. श्रीदेवी बापुय्या स्वामी, (अन्नधान्य वितरण अधिकारी कार्यालय),सोलापूर यांच्यामार्फत)
५) निवडनस्ती, ना.पु.१५.